**शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्य हाताळणूकीबाबत हमालीचे काम करणाऱ्या हमाल कंत्राटदार संस्था/ बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था / खाजगी व्यक्ती यांना महागाई निर्देशांकानुसार दयावयाच्या दरवाढीबाबत मार्गदर्शक सुचना....**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: कंत्राट-१२१६/प्र.क्र.१८४/ना.पु.१६अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ जुलै, २०१७

**संदर्भ** :- १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे परिपत्रक क्रमांक: युडब्ल्युए- १५२००५/ (१२३/३)/कामगार-५, दि. २७ मे, २००५
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्रमांक: युडब्ल्युए- १५२००५/ (१२३/३)/कामगार-५, दि. २९ एप्रिल, २००८

**शासन परिपत्रक :-**

संदर्भ क्र. २ येथिल शासन निर्णयातील तरतुदीनुसार शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्य हाताळणूकीबाबत हमालीचे काम करणाऱ्या हमाल कंत्राटदार संस्था/ बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था / खाजगी व्यक्ती यांना महागाई निर्देशांकानुसार दरवाढ मंजूर करणे अनिवार्य आहे. मात्र राज्यातील बऱ्याच जिल्ह्यात महागाई निर्देशांकानुसार होणारी दरवाढ देण्यात येत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. तसेच ज्या जिल्ह्यात महागाई निर्देशांकानुसार होणारी दरवाढ मंजूर करण्यात येते त्या जिल्ह्यामध्ये त्याची परिगणना करतांना वेगवेगळया पध्दतीने केली जाते. तर काही जिल्ह्यात दरवर्षी मार्च मध्ये येणारी दरवाढ दिली जाते, मात्र त्यापुर्वीच्या वर्षात दिलेली दरवाढ विचारात घेतली जात नाही. एकंदरच राज्यातील बहुतांश जिल्ह्यात महागाई निर्देशांकानुसार होणारी दरवाढ कशा प्रकारे परिगणित करावी याबाबत संदिग्धता आहे. यास्तव उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने महागाई निर्देशांकानुसार होणारी दरवाढ परिगणित करण्याबाबत दिलेल्या मार्गदर्शक सूचनेस अनुसरुन महागाई निर्देशांकानुसार दरवाढ मंजूर करण्याबाबत पुढील प्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

१) उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. २९ एप्रिल, २००८ रोजीच्या शासन निर्णयानुसार शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्य हाताळणूकीबाबत हमालीचे काम कार्यरत दराने स्विकारणाऱ्या किंवा नव्याने निविदा प्रक्रिया करुन त्याद्वारे काम करणाऱ्या हमाल कंत्राटदार संस्था/ बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था / खाजगी व्यक्ती यांना कार्यरत दरावर प्रत्येक वर्षी मार्च महिन्यात महागाई निर्देशांकानुसार होणारी दरवाढ अनुज्ञेय आहे.

२) दरवर्षी मार्च महिन्यामध्ये महागाई भत्त्याची परिगणना पुढील प्रमाणे करण्यात यावी :-
मागील १२ महिन्यांचा सरासरी ग्राहक मुल्य निर्देशांक - याला (A) संबोधावे.
त्या मागील वर्षाच्या सरासरी ग्राहक मुल्य निर्देशांक - याला (B) संधोधावे.

**यानुसार महागाई निर्देशांक ठरविण्याबाबतचे सुत्र पुढील प्रमाणे.**

$$\frac{A - B}{B} \times १०० = C\,\%$$

(C) ही आधारभूत दरामध्ये दयावयाची महागाई निर्देशांक वाढीची टक्केवारी असेल.

३) प्रतिवर्षी महागाई निर्देशांकानुसार वाढ परिगणित करताना केवळ आणि केवळ मूळ आधारभूत दरावर (मुळ आधारभूत दर याचा अर्थ कार्यरत दराने कामे स्विकारलेल्या कंत्राटाच्या बाबतीत, त्यांचे कंत्राट ज्यावेळी प्रथम मंजूर झाले तो दर तर अन्य बाबतीत कंत्राटामधील मंजूर आधारभूत दर होय) महागाई निर्देशांकाच्या टक्केवारीनुसार येणारी वाढ परिगणित करावी व सदर वाढ त्यावेळी अस्तित्वात असलेल्या दरात समाविष्ठ करावी.

**प्रतिवर्षी महागाई निर्देशांकानुसार दयावयाची दरवाढ परिगणित करण्याबाबत उदाहरण पुढील प्रमाणे :-**

समजा कंत्राटाच्या / मुदतवाढीच्या पहिल्या वर्षी मुळ आधारभूत दर रु. ५.०० इतका असेल तर पुढील तीन वर्षे आधारभूत दराच्या आधारे महागाई निर्देशांकाची परिगणना व त्याच्या आधारभूत दरावरील परिगणना पुढील प्रमाणे होईल.

| कालावधी दि. ०१/१०/२०१४ ते ३०/०९/२०१७ | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| दिनांक १/१०/२०१४ वर्ष पहिले | मार्च २०१५ (लगतचा मार्च महिना) | प्रदेय दर (रुपये) | मार्च २०१६ | प्रदेय दर (रुपये) | मार्च २०१७ | प्रदेय दर (रुपये) |
| मुळ आधारभूत दर रु. ५/- | महागाई भत्त्याची टक्केवारी ६% म्हणजेच वाढ रु. ०.३०/- | ५.०० + ०.३० <br> ५.३० | महागाई भत्त्याची टक्केवारी ८% म्हणजेच वाढ रु. ०.४०/- (मुळ आधारभूत दरावर) | ५.०० + ०.३० + ०.४० <br> ५.७० | महागाई भत्त्याची टक्केवारी १०% म्हणजेच वाढ रु. ०.५०/- (मुळ आधारभूत दरावर) | ५.०० + ०.३० + ०.४० + ०.५० <br> ६.२० |
| पुढील कालावधीसाठी कंत्राट / मुदतवाढ दयावयाच्या वेळेस त्यांचे सुधारित आधारभूत दर रुपये ६.२० इतके राहतील. ते पुढील कंत्राट / मुदतवाढीसाठी मुळ आधारभूत दर किंवा कार्यरत दर म्हणून विचारात घेतले जातील. | | | | | | |

४) नव्याने निविदा प्रक्रिया करुन कंत्राट निश्चित करण्यात आलेल्या प्रकरणी करारनामा झाल्यानंतर येणाऱ्या मार्च महिन्यामध्ये आधारभुत दरावर महागाई निर्देशांक निश्चित करुन त्यापुढील कालावधीपासुन महागाई निर्देशांकाची वाढ कामगारांना दयावी. अशावेळी करारनामा झालेल्या महिन्यापासून पुढील फेब्रुवारी महिन्यापर्यंचा ग्राहक मुल्य निर्देशांक विचारात घेऊन त्यानुसार सरासरी महागाई निर्देशांक ठरविण्यात यावा.

२. राज्यातील शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्य हाताळणूकीबाबत हमालीचे काम करणाऱ्या हमाल कंत्राटदार संस्था/ बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था / खाजगी व्यक्ती यांना सदर परिपत्रक निर्गमित होण्याआधी ज्या ज्या जिल्ह्यात महागाई निर्देशांकानुसार दरवाढ मंजूर करण्यात आलेली आहे, त्या ठिकाणी सदर परिपत्रकानुसार दरवाढ मंजूर करण्यात आलेली आहे किंवा कसे, याची पडताळणी करावी. अन्यथा आवश्यक त्या सुधारणा करुन याप्रमाणे महागाई निर्देशांकानुसार दरवाढ मंजूर करुन हमाल कामगारांना फरकाची रक्कम अदा करावी. तसेच ज्या ठिकाणी जास्तीची रक्कम अदा केलेली असेल त्या ठिकाणी त्याची वसुली करावी.

३. राज्यातील काही जिल्ह्यांमध्ये हमाल कंत्राटाना मुदतवाढ देताना आधारभूत दरामध्ये वाढ दिल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. हमाल कंत्राटाना मुदतवाढ देताना प्रथम हमाल कंत्राट देताना करारनामा केल्यावर जो दर निश्चित केला आहे, त्याच दरावर मुदतवाढीत काम देणे अभिप्रेत आहे.

महागाई निर्देशांक वाढ मंजूर करतांना उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. २९ एप्रिल, २००८रोजीच्या शासन निर्णयापुर्वी जी हमाल कंत्राटे झालेली आहेत व त्यांना मुदतवाढ देताना आधारभूत दरामध्ये काही वाढ दिलेली आहे, अशा प्रकरणी या शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंत या वाढी गृहीत धरुन येणारा दर हाच मुळ आधारभूत दर माणून त्यावर पुढील मार्च महिन्यापासून महागाई निर्देशांक वाढ दयावी. मात्र दि. २९ एप्रिल, २००८ च्या पुढील कालावधीत मुदतवाढ देताना आधारभूत दरात वाढ दिली असेल तर अशी वाढ समायोजित करुनच महागाई निर्देशांकाची परिगणना करण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत अतिप्रदान होणार नाही याची काळजी घ्यावी. अतिप्रदान झाल्यास त्यांची संपुर्ण जबाबदारी जिल्हा पुरवठा कार्यालयाची राहिल.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०७०६१२२६५९२६०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2017.07.06 12:27:03 +05'30'

**( सतिश श्रीधर सुपे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
३) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
४) सर्व उपायुक्त (पुरवठा)
५) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
६) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
७) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
८) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
९) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परीक्षा परिमंडळ -द्वारा: वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१२) वित्त विभाग ( व्यय ४), मंत्रालय, मुंबई.
१३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (कामगार-५), मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती/नापु-१६अ.